दिवगंत नेते रा.सु.गवई यांचे मौ.वडाळी, ता.जि.अमरावती येथील स्मारकाच्या कामासाठी रु.१.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकिर्ण-२०१८/प्र.क्र.७४०/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ ऑगस्ट, २०२३

**वाचा:-** (१) नगरविकास विभाग शासन निर्णय, क्र.अमपा-२०१८/प्र.क्र. ७३/नवि-२६, दि.२९.१०.२०१८
(२) नगरविकास विभाग शासन निर्णय, क्र.स्मारक-२०१८/प्र.क्र.७४०/नवि-२०, दि.२९.१०.२०१८
(३) वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
(४) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र.कक्ष-२०/नविशा/कावि-४८/२०२३, दि.२४.०८.२०२३

**प्रस्तावना:-**

दिवगंत नेते रा.सु.गवई यांचे मौ.वडाळी, ता.जि.अमरावती येथील स्मारकाच्या रु..२०.०३ कोटीच्या टप्पा-१ मधील कामाच्या विकास आराखडयास नगरविकास विभाग, शासन निर्णय क्र.अमपा-२०१८/प्र.क्र. ७३/नवि-२६, दि.२९.१०.२०१८ अन्वये काही अटी व शर्तीवर प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच या कामासाठी नगरविकास विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०१८/प्र.क्र.७४०/नवि-२०, दि.२९.१०.२०१८ अन्वये काही अटी शर्तीच्या अधिन राहून रु.२.५० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर वितरीत निधी खर्च झाल्याचे, तसेच या स्मारकाच्या बांधकामामध्ये पहिल्या मजल्याचे ७०% काम पुर्ण झाले असून, यावर रु.१०.०० कोटी इतक्या रकमेचे काम पुर्ण झालेले आहे. आता या स्मारकाच्या उर्वरित कामाकरीता रु.१७.५३ कोटी इतक्या निधीची आवश्यकता असल्याचे जिल्हाधिकारी, अमरावती यांनी त्यांच्या दि.२४.०८.२०२३ च्या पत्रान्वये कळविले आहे. यास अनुसरुन प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने उर्वरित रु.१७.५३ कोटी पैकी रु.१.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

दिवगंत नेते रा.सु.गवई यांचे मौ.वडाळी, ता.जि.अमरावती येथील स्मारकाच्या उभारण्याकरीता रु.१.०० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

०१. उपरोक्त नगरविकास विभाग शासन निर्णय, क्र.अमपा-२०१८/प्र.क्र. ७३/नवि-२६, दि.२९.१०.२०१८ नुसार विहित अटी व शर्तीच्या अधीन राहुन आवश्यक ती कार्यवाही करावी.

०२. दिनांक ३१ मार्च, २०२४ अखेर ही निधी खर्च करण्याची मुदत संपल्यानंतर जिल्हाधिकारी, अमरावती यांनी या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करीता वितरीत करण्यात येणाऱ्या सर्व निधीच्या उपयोगिताचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे. सदरची उपयोगिता प्रमाणपत्र एकत्रितरीत्या संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करुन खर्चित व अखर्चित निधीचा अहवाल शासनास सादर करावा.

०३. या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या एकुण रक्कम रु.१.०० कोटी (रुपये एक कोटी फक्त ) चे कार्यान्वयन यंत्रणेस वितरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, अमरावती यांना नियंत्रण अधिकारी तसेच जिल्हा प्रशासन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी आहरीत करुन कार्यान्वयन यंत्रणेस वितरीत करावा.

०४. यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, ८०, सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (८३) नागरी भागात स्मारके उभारण्यासाठी महानगरपालिकांना सहाय्यक अनुदान, ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), (२२१७ A०३८) या लेखाशिर्षाखाली सदर लेखाशिर्षांतर्गत **सन २०२३-२४ करिता रुपये** मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ अनुसार सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२९१५०९०७१२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2023.08.29 15:11:48 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
२) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा. लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय
९) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) जिल्हाधिकारी, अमरावती
११) आयुक्त, अमरावती महानगरपालिका
१२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१४) जिल्हा प्रशासन अधिकारी, अमरावती
१५) वित्त विभाग, व्यय-३ / कोषा प्रशासन-५ / अर्थसं-१६ / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१६) उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१७) कक्ष अधिकारी (नवि-२६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१८) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदरचा शासन निर्णय विभागाच्या नागरीकांची सनद वर प्रसिध्द करण्यात यावा.

१९) निवडनस्ती (नवि-२०)